तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरावरील बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपन हा मुद्दा स्थायी विषय म्हणून बैठकांच्या विषयसूचीमध्ये आणि क्षेत्रीय स्तरावरील निरिक्षण भेटीमध्ये अंतर्भूत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्रक्र.८१/सम-२

गो. ते. रुग्णालय संकुल, नवीन मंत्रालय,
मुंबई ४०० ००१
तारीख: २७ जून, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्रमांक्र-साववि-२०१६/प्र.क्र.१३१/फ-११, दि. ३१.०३.२०१६

२) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्रमांक्र-साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि. १०.१०.२०१६

३) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्रमांक्र-साववि-२०१६/प्र.क्र.१६६/फ-११, दि. ०४.०१.२०१७

**प्रस्तावना -**

हवामान आणि त्याचबरोबर आतापर्यंत लागवड केलेल्या झाडांचे संरक्षण, देखभाल आणि संगोपन उत्तमरितीने होणे हे अत्यंत गरजेचे आहे. दि. १ जुलै ते ७ जुलै, २०१७ या कालावधीमध्ये ४ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाचे सादरीकरण मा. मंत्रीमंडळासमोर दि. १३ जून, २०१७ रोजी करण्यात आले. त्यावेळी झालेल्या चर्चेनुसार यासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत आणि ऋतूबदल, वाढते तापमान, दुष्काळ आणि पाण्याचे दुर्भिक्ष या नैसर्गिक आपत्तींची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी “हरित महाराष्ट्र” ही संकल्पना राबविण्याचा महत्वपूर्ण निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१७ ते २०१९ या कालावधीत ५० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट ठरविण्यात आले असून, सन २०१७ मध्ये ४ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाची अंमलबजावणी झाली आहे. त्याशिवाय सन २०१६ मध्ये दि. १ जुलै, २०१६ या एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवडीचा आगळा वेगळा व महत्वाकांक्षी कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला. सन २०१८ आणि सन २०१९ मध्ये अनुक्रमे १३ कोटी आणि ३३ कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट आहे. वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट पूर्णपणे साध्य व्हावे मा. मंत्री मंडळाने दिलेल्या सहमतीनुसार क्षेत्रीय कार्यालयांना आवश्यक त्या सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार या परिपत्रकाद्वारे त्याअनुषंगाने पुढील प्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

## शासन निर्णय -

१. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत क्षेत्रीय स्तरावरील तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरीय बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपन या संदर्भातील विषय प्रत्येक बैठकांच्या वेळी विषयसूचीमध्ये स्थायी विषय म्हणून अंतर्भूत करण्यात यावा. अशा बैठकांमध्ये वृक्ष लागवडीचा आढावा, यापुर्वी लावलेल्या झाडांचे जिवंत राहण्याचे

प्रमाण, मृत झाडांच्या जागी नवीन झाडांची लागवड, पुढील वर्षांमध्ये वृक्ष लागवडीच्या उद्दिष्टाप्रमाणे वृक्षारोपणासाठी स्थळ निश्चिती, रोपांची उपलब्धता, आवश्यक त्या तांत्रिक परिमाणाप्रमाणे विहित कालावधीमध्ये पिटस् तयार करणे, निधीची उपलब्धता इत्यादी संदर्भात पूर्व तयारीबाबत आढावा घेण्यात यावा.

२. अशा बैठकांमध्ये वृक्ष लागवड कार्यक्रमासंदर्भात झालेल्या निर्णयांची नोंद बैठकीच्या इतिवृत्तामध्ये करण्यात यावी. तसेच इतिवृत्तामध्ये नमूद केलेल्या निर्णयासंदर्भात झालेल्या अंमलबजावणीबाबत आणि येणाऱ्या अडचणी संदर्भात पुढील बैठकीमध्ये चर्चा होऊन क्षेत्रीय अधिकाऱ्यांना येणाऱ्या समस्या आणि अडचणी सोडविण्यासाठी उपाययोजना करण्यात याव्यात.

३. तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरावरील जे अधिकारी क्षेत्रीय कामांना भेटी देतील, त्यावेळी त्या त्या विभागांतर्गत वृक्ष लागवडीच्या स्थळांना आवर्जून भेटी देण्याचा कार्यक्रम आयोजित करण्यात यावा. अशा क्षेत्रीय भेटीच्या वेळी संबंधित प्रशासकीय विभागांतर्गत लावलेल्या झाडांचे संरक्षण योग्यरितीने होते किंवा नाही, मृत झाडांच्या बदल्यात नवीन झाडे लावली गेली किंवा नाही, पाण्याची व्यवस्था आणि संरक्षणासाठी मनुष्यबळ इत्यादी बाबींची वरिष्ठ अधिकाऱ्यांनी पाहणी करावी. त्याचप्रमाणे येणाऱ्या अडचणी सोडविण्याबाबत उपाययोजना कराव्यात.

४. तसेच प्रस्तावित वृक्ष लागवडीसाठी निवडलेली स्थळे, आवश्यक त्या परिमाणाचे पिटस् विहित वेळेत तयार करणे आणि अशा स्थळांवर लावण्यात येणाऱ्या झाडांसाठी पाण्याची आणि संरक्षण व्यवस्था, वृक्ष लागवडीसाठी निधीची व्यवस्था, याबाबत देखील पाहणी करुन क्षेत्रीय अधिकाऱ्यांना आवश्यक ते मार्गदर्शन द्यावे .

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२६१३३४३४९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8677f048b175e3eefdc5e6bb10b24d340cce91df668f3307ee4961f9aebfdc13, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2018.06.27 12:18:33 +05'30'

( मनोहर ठोंबरे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन मुंबई.
२. आयुक्त , राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा मुंबई.
४. अतिरिक्त संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय , पुणे.
५. अतिरिक्त संचालक, ( एनसीडी ) मुंबई.

६. सर्व सह संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

७. सर्व सह सचिव/ उप सचिव, सार्वजनिक आरोगय विभाग, मंत्रालय मुंबई.

८. उप संचालक, मंडळ कार्यालय, ठाणे, पुणे, नाशिक, कोल्हापूर, औरंगाबाद, लातूर, अकोला, नागपूर.

९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, ( ठाणे, रायगड, पुणे, सोलापूर, रत्नागिरी, नाशिक, जळगाव , धुळे, नंदूरबार, अहमदनगर, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, बुलढाणा, नागपूर, गडचिरोली, वर्धा, चंद्रपूर, भंडारा, गोंदिया, कोल्हापूर, सिंधुदूर्ग, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, लातूर, बीड, नांदेड, उस्मानाबाद.)

१०. जिल्हा आरोग्य अधिकारी, ( ठाणे, रायगड, पुणे, सोलापूर, रत्नागिरी, नाशिक, जळगाव , धुळे, नंदूरबार, अहमदनगर, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, बुलढाणा, नागपूर, गडचिरोली, वर्धा, चंद्रपूर, भंडारा, गोंदिया, कोल्हापूर, सिंधुदूर्ग, सातारा, सांगली, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, लातूर, बीड, नांदेड, उस्मानाबाद.- आरोग्य सेवा संचालनालयामार्फत.)

११. प्राचार्य, सर्व नर्सिंग महाविद्यालये. ( संचालनालयामार्फत)

१२. प्राचार्य, सर्व आरोग्य व कुटूंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, जिल्हा प्रशिक्षण केंद्र, रूग्णालये प्रशिक्षण केंद्र, प्रशिक्षण केंद्र.

१३. वैद्यकिय अधिक्षक, सर्व रूग्णालये. ( संचालनालयामार्फत)

१४. वैद्यकिय अधिकारी, सर्व प्राथमिक आरोग्य केंद्र ( संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या मार्फत )महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५. निवडनस्ती. सम-२